पोलीस शिपाई भरती २००४ लेखी परिक्षेच्या उत्तरपत्रिका व त्याची संगणकामार्फत तपासणी, इन्स्टियुट ऑफ बॅकिंग पर्सनल सिलेक्शन, कांदिवली (पूर्व) या संस्थे - मार्फत करुन घेण्यास व त्या पोटी करण्यात आलेल्या रु.१,५१,९२१/- खर्चास मंजूरी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्रमांक : एमआयएस ०३०४/सीआर-२८८/ पोल-५अ
मंत्रालय,मुंबई-४०००३२, दिनांक : २३ फेब्रुवारी,२००५.

**शासन निर्णय** :-

भरती प्रक्रिया पारदर्शकरित्या पूर्ण करण्यासाठी पोलीस भरती २००४- लेखी परिक्षेच्या उत्तर पत्रिका, व त्याची संगणकामार्फत तपासणी, इन्स्टियुट ऑफ बॅकीग पर्सनल सिलेक्शन, आयबीपीएस हाऊस,ठाकूर कॉम्पलेक्स च्या पाठीमागे,९० डी.पी.रोड, कांदिवली (पूर्व) मुंबई-१०१ या संस्थेकडून करुन घेण्यास प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे. तथापि, यापुढे अशा संस्थाकडून अशाप्रकारे काम करुन घेण्यासाठी शासनाची पूर्व परवानगी घेण्यात यावी.

२. तसेच, त्यापोटी करण्यात आलेल्या रु.१,५१,९२१/-(रुपये एक लाख एक्कावन हजार नऊशे एकवीस फक्त) एवढया खर्चाच्या रकमेस शासन मंजूरी देत आहे.

३. यासाठी होणारा खर्च, "२०५५-पोलीस, १०९ (२) (१) शहर पोलीस, ०५- कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखाली टाकण्यात यावा आणि तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.सीआर ५८/०५, व्यय-७, दि.१५ फेब्रुवारी, २००५ अन्वये व त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( प्र. ता. गौड )
सह सचिव, महाराष्ट्र शासन,गृह विभाग.

प्रति,

पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य,मुंबई.
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई.
वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई (कार्या व्यय-७)